**नागरी पायाभूत सुविधा विकास निधी (UIDF) अंतर्गत राष्ट्रीय गृहनिर्माण बँकेकडून प्राप्त कर्जाची रक्कम विविध नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना वितरीत करण्याबाबत. (सन २०२४-२५)**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- युआयडीएफ-२०२५/प्र.क्र.१०५/नवि-३३**
**हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड,**
**मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२**
**दिनांक : २८ मार्च, २०२५.**

**वाचा :-**

१. वित्त विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०२३/प्र.क्र.५२/अर्थबळ, दिनांक ०४ जानेवारी, २०२४.
२. नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०२४/प्र.क्र.४२/नवि-३३, दिनांक ०५ ऑगस्ट, २०२४.
३. राष्ट्रीय गृहनिर्माण बँकेचा दिनांक १९ मार्च, २०२५ व २१ मार्च, २०२५ रोजीचा ईमेल.

**प्रस्तावना :-**

ग्रामीण पायाभूत विकास निधीच्या (RUDF) धर्तीवर शहरी भागातील पायाभूत सुविधांच्या विकासाकरिता नागरी पायाभूत सुविधा विकास निधी (UIDF) योजनेची राज्यात अंमलबजावणी सुरू आहे.

सदर योजनेंतर्गत राष्ट्रीय गृहनिर्माण बँकेने केंद्र पुरस्कृत अमृत २.० व नगरोत्थान महाभियानांतर्गत मंजूर विविध नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांमधील पाणीपुरवठा / मलनिःस्सारण / रस्ते विकास इ. विविध प्रकल्पांना मंजूर करण्यात आलेल्या कर्जाच्या पहिल्या हप्त्यापोटी वितरित करण्यात आलेला रुपये ४०.९० कोटी (रुपये चाळीस कोटी नव्वद लक्ष फक्त) निधी संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. या अनुषंगाने खालीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**<u>शासन निर्णय</u> :-**

**१.** राष्ट्रीय गृहनिर्माण बँकेने केंद्र पुरस्कृत अमृत २.० व नगरोत्थान महाभियानांतर्गत मंजूर विविध नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांमधील पाणीपुरवठा / मलनिःस्सारण / रस्ते विकास इ. विविध प्रकल्पांना मंजूर करण्यात आलेल्या कर्जाच्या पहिल्या हप्त्यापोटी वितरित करण्यात आलेल्या कर्ज रक्कमेपोटी **सन २०२४-२५** या चालू वित्तीय वर्षातील अर्थसंकल्पीय तरतूदी मधून **रुपये ४०.९० कोटी (अक्षरी रुपये चाळीस कोटी नव्वद लक्ष फक्त) निधी परिच्छेद- २ मधील रकाना ७ नुसार संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना** वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

**२.** राष्ट्रीय गृहनिर्माण बँकेने विविध प्रकल्पांना मंजूर करण्यात आलेल्या कर्जाच्या पहिल्या हप्त्यापोटी वितरित करण्यात आलेल्या निधीचा तपशील खालीलप्रमाणे आहे.

(रुपये कोटीत)

| अ. क्र | नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेचे नाव | योजनेचे नाव | प्रकल्पाचा प्रकार | प्रकल्प किंमत | NHB द्वारे मंजूर कर्ज रक्कम | सद्यस्थितीस वितरित करावयाचा पहिल्या हप्त्याचा निधी |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| १ | **धुळे** | अमृत २.० | पाणीपुरवठा | १४२.७६ | ३२.१२ | **९.०९** |
| २ | **लातूर** | अमृत २.० | मलनिःस्सारण | ३०५.१९ | ६८.६७ | **९.६७** |
| ३ | **बार्शी** | नगरोत्थान | रस्ते विकास | ८९.५७ | १५.९३ | **११.३५** |
| ४ | **परळी वैजनाथ** | नगरोत्थान | मलनिःस्सारण | १०१.८६ | ११.४६ | **७.८३** |
| ५ | **बार्शी** | नगरोत्थान | रस्ते विकास | ९२.५४ | १०.३४ | **०.२७** |
| ६ | **उदगीर** | नगरोत्थान | मलनिःस्सारण | १६१.०४ | १८.१२ | **०.८९** |
| ७ | **यवतमाळ** | नगरोत्थान | पाणीपुरवठा | ९१.०१ | १०.२४ | **१.८०** |
| Total | | | | ९८३.९७ | १६६.८८ | **४०.९०** |

**३.** उपरोक्त रक्कम “मागणी क्र - एफ-७, ६२१७, नगर विकासासाठी कर्जे, ६० इतर नगर विकास योजना, १९१, स्थानिक संस्था, महानगरपालिका, इत्यादींना कर्जे, (०१) राष्ट्रीय आवास बँकेकडून कर्ज (०१) (०१) नागरी पायाभूत विकास निधी अंतर्गत राष्ट्रीय आवास बँकेकडून नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना कर्ज (कार्यक्रम) (६२१७ १०३१), ५५, कर्ज व आगाऊ रकमा” या लेखाशिर्षाखाली खर्च घालून सन २०२४-२५ मधील मंजूर अर्थसंकल्पीय तरतूदीतून खर्ची घालण्यात यावा.

**४.** उपरोक्त लेखाशीर्ष उपयोगात आणण्यासाठी नगर विकास विभागाचे कक्ष अधिकारी, नवि-५ (रोखशाखा) यांना आहरण व संवितरण अधिकारी तसेच सह सचिव, नवि-५ यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. या बाबतच्या खर्चमेळाची कार्यवाही नवि-३१ कार्यासनाने करावी. शासन निर्णयातील परिच्छेद क्र. २ मध्ये नमूद करण्यात आलेली रक्कम अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांचेकडून काढून ती संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना देण्यासाठी त्यांना अधिकार प्रदान करण्यात येत आहेत. नगर विकास विभागाच्या रोखशाखेने देयक तयार करून ते अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई यांच्याकडे पाठवावे. सदर निधी वितरण हे बिनशर्त स्वरुपाचे आहे.

**५.** नागरी पायाभूत सुविधा विकास निधी (UIDF) योजनेंतर्गत प्राप्त होणाऱ्या कर्जाच्या रक्कमांसाठी संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांनी महालेखापाल यांनी विहित केलेल्या नमुन्यात लेखे ठेवावे.

६. संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांनी त्यांना परिच्छेद क्र. २ मधील प्रकल्पांकरीता राष्ट्रीय गृहनिर्माण बँककडून प्राप्त होणाऱ्या कर्जाच्या रक्कमेचा विनियोग राष्ट्रीय गृहनिर्माण बँककडून कर्ज स्वरूपात मंजूर करण्यात आलेल्या प्रकल्पासाठीच्या ज्या प्रयोजनासाठी निधी मंजूर केला आहे त्याच प्रयोजनासाठी खर्च होईल याची संपूर्ण जबाबदारी आयुक्त / मुख्याधिकारी, संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्था यांची राहील.

७. सदर रक्कम वितरीत झाल्यानंतर या रक्कमेतून खर्च केलेल्या रक्कमांचा तपशील राज्य शासनास वेळोवेळी सादर करण्यात यावा तसेच लेखापरिक्षणासाठी शासनास / शासनाने नियुक्त केलेल्या यंत्रणेस उपलब्ध करून देण्याची संपूर्ण जबाबदारी आयुक्त / मुख्याधिकारी, संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थां यांची राहील.

८. संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांनी त्यांना संबंधित प्रकल्पांकरीता राष्ट्रीय गृहनिर्माण बँककडून प्राप्त झालेल्या कर्जाच्या अनुषंगाने कर्जावरील व्याज “००४९, व्याजाच्या जमा रकमा ०४, राज्य/संघराज्य क्षेत्र विधानमंडळ असलेल्या शासनाच्या व्याजाच्या जमा रकमा १९१, स्थानिक संस्थांकडून मिळालेले व्याज ०१, स्थानिक संस्थांकडून मिळालेले व्याज, नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना नागरी पायाभूत विकास निधी अंतर्गत दिलेल्या कर्जावरील व्याज (०१)(०१४) लेखाशीर्ष (००४९ ५१८१)” या लेखाशिर्षाखाली राज्य शासनाकडे तातडीने जमा करावे व भरणा केलेल्या रक्कमेच्या चलनाची प्रत शासनास सादर करावी.

९. संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांनी त्यांना संबंधित प्रकल्पांकरीता राष्ट्रीय गृहनिर्माण बँककडून प्राप्त होणाऱ्या कर्जाची मुद्दल व त्यावरील व्याजाची परतफेड राष्ट्रीय गृहनिर्माण बँकेने विहित केलेल्या Sanction Letter मधील तरतुदीनुसार /शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या अटी व शर्तीनुसार राज्य शासनास होईल याची संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांनी खबरदारी घ्यावी.

१०. संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांनी त्यांना संबंधित प्रकल्पांकरीता राष्ट्रीय गृहनिर्माण बँककडून प्राप्त होणाऱ्या कर्ज रक्कमेच्या वितरणाच्या अटी व शर्ती संदर्भात शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेले सर्व शासन निर्णय / शासन परिपत्रक/ जबाबदाऱ्या/अटी व शर्ती यांचे पालन करण्याची संपूर्ण जबाबदारी संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांची राहील.

११. सदर कर्ज मंजूर करताना राज्य शासनाने तसेच, राष्ट्रीय गृहनिर्माण बँकेने वेळोवेळी विहित केलेल्या अटी व शर्तींची पूर्तता करण्याची संपूर्ण जबाबदारी कर्ज मंजूर करण्यात आलेल्या संबंधित नागरी स्थानिक संस्थांची राहील.

१२. राज्य शासनाकडून दिल्या जाणाऱ्या सदर कर्जासाठी राज्य शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या कर्जा विषयीच्या इतर संबंधित अटी व शर्ती लागू राहतील.

**१३.** सदर कर्ज वितरणाबाबत वित्त विभाग शासन निर्णय क्र. शादिक-२०१२/प्र.क्र.४९/ऋण व हमी, दिनांक ३० डिसेंबर, २०१४ मधील सूचनानुसार महाऋण आज्ञावलीत जोडपत्र-अ (सोबत जोडले आहे) नुसार माहिती भरण्याची कार्यवाही संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्थानी प्राथम्याने करण्यात यावी.

**१४.** सदर शासन निर्णय हा वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दिनांक ०१ एप्रिल, २०२४ व क्र. अर्थसं-२०२४/प्र.क्र.-१०८/अर्थ-३, दिनांक ०८ जानेवारी, २०२५ अन्वये सर्व बाबींची पुर्तता होत असल्याने व वित्त विभागाने त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक अ.सं.क्र.१६१/व्यय-३, दिनांक २८ मार्च, २०२५ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरुन निर्गमित करण्यात येते आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२५०३२८१६४०२७४०२५ असा आहे. सदर शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

ANIRUDDHA
VENKTESH JEWLIKAR

Digitally signed by ANIRUDDHA VENKTESH JEWLIKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT,
2.5.4.20=29c6c42b5811a121a201ecd7aceaac3251c7d1ded31ff1b6e1a88d86b600c6bd, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=B986D51C7C29938C2BBB53D563F07DFC61C84B730CB9118407ECAB6A27C67C4C, cn=ANIRUDDHA VENKTESH JEWLIKAR
Date: 2025.03.28 16:41:02 +05'30'

**(अनिरुद्ध जेवळीकर)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव.
२. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
३. मा. उप मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
४. अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. प्रधान सचिव (नवि-२) नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
६. महालेखापाल- (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई.
७. निवासी अधिदान व लेखा अधिकारी, (लेखा परीक्षा), मुंबई.
८. सहसंचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासकीय इमारत, मुंबई ३२ .
९. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
१०. सह सचिव,नवि-५, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
११. कक्ष अधिकारी, नवि-४/ नवि-५/नवि-३१, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई ३२ .
१२. आयुक्त, धुळे, लातूर महानगरपालिका.
१३. मुख्याधिकारी, बार्शी, परळी वैजनाथ, उदगीर, यवतमाळ नगरपरिषद.
१४. रोख शाखा (३ प्रती),
१५. निवड नस्ती, नवि-३३.

**शासन निर्णय क्रमांक : युआयडीएफ-२०२५/प्र.क्र.१०५/नवि-३३, दिनांक २८ मार्च, २०२५ चे सहपत्र**

**जोडपत्र-अ**

**केंद्र पुरस्कृत नागरी पायाभूत सुविधा विकास निधी (UIDF) अंतर्गत राष्ट्रीय गृहनिर्माण बँकेकडून प्राप्त कर्जाची रक्कम विविध नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना वितरीत करण्याबाबत.**

<table>
<tr><th>अ. क्र.</th><th>विवरण</th><th>माहिती</th></tr>
<tr><td>१</td><td>नागरी स्थानिक संस्थांचे नाव</td><td>सदर शासन निर्णयातील परिच्छेद - २ मधील नमूद नागरी स्थानिक स्वराज्य संस्था</td></tr>
<tr><td>२</td><td>वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्रमांक व दिनांक</td><td>अ.सं.क्र. १६१/व्यय-३, दिनांक २८ मार्च, २०२५</td></tr>
<tr><td>३</td><td>कर्जाची एकूण मंजूर रक्कम</td><td>रुपये १०३७.४८ कोटी</td></tr>
<tr><td>४</td><td>मंजूर कर्जापैकी यापूर्वी कर्जाची रक्कम वितरीत करण्यात आली असल्यास वितरीत करण्यात आलेली कर्जाची रक्कम</td><td>रुपये १४२.१२ कोटी</td></tr>
<tr><td>५</td><td>मंजूर कर्जापैकी सदर शा.नि. अन्वये वितरीत करण्यात येत असलेली कर्जाची रक्कम</td><td>रुपये ४०.९० कोटी</td></tr>
<tr><td>६</td><td>एकापेक्षा अनेक सहकारी संस्था, व्यक्ती/यांना कर्ज मंजूर करण्यात आले असल्यास त्यांच्या नावासमोर, कर्ज मंजूरी रक्कम नमूद करण्यात यावी</td><td>
<table>
<tr><th>अ. क्र</th><th>नागरी स्थानिक स्वराज्य संस्थेचे नाव</th><th>NHB द्वारे वितरित कर्जाचा पहिल्या हप्त्याचा निधी (रु. कोटीत)</th></tr>
<tr><td>१</td><td>धुळे महानगरपालिका</td><td>९.०९</td></tr>
<tr><td>२</td><td>लातूर महानगरपालिका</td><td>९.६७</td></tr>
<tr><td>३</td><td>बार्शी नगरपरिषद</td><td>११.६२ (११.३५+०.२७)</td></tr>
<tr><td>४</td><td>परळी वैजनाथ नगरपरिषद</td><td>७.८३</td></tr>
<tr><td>५</td><td>उदगीर नगरपरिषद</td><td>०.८९</td></tr>
<tr><td>६</td><td>यवतमाळ नगरपरिषद</td><td>१.८०</td></tr>
<tr><td colspan="2">एकूण</td><td>४०.९०</td></tr>
</table>
</td></tr>
<tr><td>७</td><td>एकूण कर्ज परतफेडीचे हप्ते</td><td>५</td></tr>
<tr><td>८</td><td>कर्ज परतफेडीचे हप्त्याची रक्कम</td><td>करारनाम्यानुसार</td></tr>
</table>

| अ. क्र. | विवरण | माहिती |
|---|---|---|
| ९ | कर्ज परतफेडीचे हप्त्याच्या कालावधी, जसे वार्षिक/सहामाही/त्रैमासिक इत्यादी | वार्षिक |
| १० | कर्ज परतफेडीसाठी सवलतीचा कालावधी (Moratorium Period) | २ वर्षे |
| ११ | कर्ज परतफेडीसाठी हप्त्याच्या निश्चित केलेला कर्ज हप्त्याचा दिनांक | BDS दिनांकापासून |
| १२ | कर्ज परतफेडीच्या पहिल्या हप्त्याचा दिनांक | BDS दिनांकापासून ३६ महिने |
| १३ | कर्ज परतफेडीच्या शेवटच्या हप्त्याचा दिनांक | BDS दिनांकापासून ८४ महिने |
| १४ | व्याज दर | ५ % |
| १५ | विलंब कालावधीसाठी दंडनीय व्याजदर व इतर आकार | ५ % |
| १६ | व्याजाचा परतफेडीच्या हप्त्याचा कालावधी जसे वार्षिक/त्रैमासिक/सहामाही इत्यादी | त्रैमासिक |
| १७ | कर्जाच्या खर्चाकरीता लेखाशिर्ष | मागणी क्र - एफ-७, ६२१७, नगर विकासासाठी कर्जे, ६० इतर नगर विकास योजना, १९१, स्थानिक संस्था, महानगरपालिका, इत्यादींना कर्जे, (०१) राष्ट्रीय आवास बँकेकडून कर्ज (०१) (०१) नागरी पायाभूत विकास निधी अंतर्गत राष्ट्रीय आवास बँकेकडून नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना कर्ज (कार्यक्रम) (६२१७ १०३१), ५५, कर्ज व आगाऊ रकमा कार्यक्रम/दत्तमत्त” |
| १८ | कर्जाच्या वसूलीचे लेखाशिर्ष | मागणी क्र - एफ-७ ६२१७, नगर विकासासाठी कर्जे ६०, इतर नगर विकास योजना १९१, स्थानिक संस्था, महानगरपालिका, नगर विकास प्राधिकरणे व नगर सुधार मंडळे इत्यादीना कर्ज, (०१) राष्ट्रीय आवास बँकेकडून कर्ज (०१) (०१) नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांकडून नागरी पायाभूत विकास निधी अंतर्गत दिलेल्या मुद्दलाची वसूली लेखाशीर्ष (६२१७ ५१४४) |
| १९ | कर्जावरील व्याज/दंडनिय व्याज वसूलीचे लेखाशिर्ष | ००४९, व्याजाच्या जमा रकमा ०४, राज्य/संघराज्य क्षेत्र विधानमंडळ असलेल्या शासनाच्या व्याजाच्या जमा रकमा १९१, स्थानिक संस्थांकडून मिळालेले व्याज ०१, नागरी स्थानिक स्वराज्य संस्थांना नागरी पायाभूत विकास निधी अंतर्गत दिलेल्या कर्जावरील |

| अ. क्र. | विवरण | माहिती |
|---|---|---|
| | | व्याज (०१)(०१४) लेखाशीर्ष (००४९ ५१८१) |
| २० | कर्जाशी संबंधित असलेल्या सहकारी संस्था यांचे पदनाम, पत्ता व दूरध्वनी क्रमांक | आयुक्त / मुख्याधिकारी,<br>संबंधित नागरी स्थानिक स्वराज्य संस्था |
| २१ | नोडल ऑफीसचे पदनाम, पत्ता व दूरध्वनी क्रमांक | उप सचिव, नगर विकास विभाग, ४ था मजला, मुख्य इमारत, हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय,<br>मुंबई - ४०० ०३२. दूरध्वनी क्र. ०२२- २२७९४२०६ |
| २२ | सदरचे कर्ज बाह्य सहाय्यित प्रकल्पांतर्गत (EAP) कर्ज घेऊन वितरित करण्यात येत आहेत किंवा कसे, असल्यास ज्या आंतरराष्ट्रीय संस्थेकडून कर्ज घेण्यात आलेल्या त्या संस्थेचे नाव | लागू नाही |
| २३ | देशांतर्गत वित्तीय संस्थेकडून कर्ज घेऊन कर्ज वितरित करण्यात येत असल्यास त्या संस्थेचे नाव व पत्ता | राष्ट्रीय गृहनिर्माण बँक, मुंबई क्षेत्रीय कार्यालय, ३ रा मजला, बॉम्बे लाईफ बिल्डिंग, वीर नरीमन रोड, फोर्ड, मुंबई - ४०० ००१. |
| २४ | डी. डी.ओ.चा नंबर | कक्ष अधिकारी, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.<br>डी.डी.ओ. नंबर - ७१०१००२३०१. |
| २५ | इतर | निरंक |

ANIRUDDHA
VENKTESH JEWLIKAR

Digitally signed by ANIRUDDHA VENKTESH JEWLIKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT,
2.5.4.20=29c6c42b5811a121a201ecd7aceaac3251c7d1ded31ff1b6e1a88d86b600c6bd, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=B986D51C7C29938C2BBB53D563F07DFC61C84B730CB9118407ECAB6A27C67C4C, cn=ANIRUDDHA VENKTESH JEWLIKAR
Date: 2025.03.28 16:41:45 +05'30'

(अनिरुद्ध जेवळीकर)
उप सचिव, महाराष्ट्र शासन